सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत. लेखाशीर्ष-२४१५ ११३९ (कार्यक्रमांतर्गत)

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : मकृप-१०१९/प्र.क्र.५/७-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ ऑक्टोबर, २०२१.

वाचा :- महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे क्रमांक मकृप/शिक्षण-१/८२१/१४०१/२०२१, दि.१९.०७.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील, आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनंतर्गत महाडिबिटीप्रणालीद्वारे शिष्यवृत्ती प्रदान करण्यात येते. सदर योजनेंतर्गत शिष्यवृत्तीसाठी सन २०२१-२२ या चालु आर्थिक वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचेकडुन संदर्भाधीन पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर करण्यात आलेला होता. या अनुषंगाने राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान २४१५ ११३९ (कार्यक्रम) ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने या बाबीखाली अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील, आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनंतर्गत महाडिबिटीप्रणालीद्वारे शिष्यवृत्ती प्रदान करण्यात येते. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता "२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन" १२०-इतर संस्थाना सहाय्य, (००)(२४) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान २४१५ ११३९ (कार्यक्रम) ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने या बाबीखाली रु.७,००,००,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट बाब /** | **आहरण व संवितरण अधिकारी** | **सन २०२१-२२ करिता अर्थसंकल्पीय तरतूद** | **वितरीत करावयाची तरतूद** |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| | | **महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे** | | | |
| १. | ०१, पीक संवर्धन १२०, इतर संस्थाना सहाय्य (००)(२४) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ११३९) | ३४- शिष्यवृत्या / विद्यावेतने | सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे | ३५००.०० | ७००.०० |

२. सदरची मंजुरी ही खाली नमुद अटी व शर्तीच्या अधिन राहुन देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :**

१) योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी इतर बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

२) सदर रु.७.०० कोटी मधुन सन २०२०-२१ मधील प्रलंबित देयकाचा खर्च भागविण्यात यावा, त्यानंतरही अनुदान शिल्लक राहत असल्यास चालु आर्थिक वर्षातील लाभार्थी विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरीता अनुदान उपयोगात आणावे. सदरची रक्कम ही राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतील पात्र विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात महाडिबिटी प्रणालीद्वारे वितरीत करण्याची व्यवस्था संचालक (शिक्षण), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचेकडुन करण्यात यावी.

३) मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठे लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम

अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

४) सन २०२१-२२ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३. उपरोक्त विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत स्तंभ क्र. ६ खाली मंजूर केलेले अनुदान अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. या प्रित्यर्थचा खर्च उपरोक्त विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ साठी मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७६/१४३१, दि.१२.०८.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७६/२०२१/व्यय-१, दि.१५.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२११००४१२४०४२९३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Varsha Mangesh Meher
Date: 2021.10.04 12:42:50 +05'30'

**( वर्षा मेहेर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / संचालक (शिक्षण),महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी / डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली / वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी / डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.

३) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,

४) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,

७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

९) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

१०) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

११) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१२) अवर सचिव /कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

१३) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.